हवामान अनुकूल कृषी प्रकल्पाचे (PoCRA) नांव यापुढे "नानाजी देशमुख कृषी संजीवनी प्रकल्प" असे सुधारीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: हअप्र-०७१६ /प्र.क्र. ८२/राकृवियो कक्ष**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
तारीख: १७ जानेवारी, २०१७

वाचा :

१. कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई शासन निर्णय क्र. हअप्र-०७१६/प्र. क्र. ८२ /राकृवियो कक्ष, दि. ०७/०७/२०१६
२. कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई शासन निर्णय क्र. हअप्र-०७१६/प्र. क्र. ८२ /राकृवियो कक्ष, दि. १०/०८/२०१६

प्रस्तावना :

विदर्भ व मराठवाडयातील सुमारे ४००० दुष्काळग्रस्त गावांमध्ये तसेच विदर्भातील पुर्णा नदीच्या खोऱ्यातील खारपाण पट्टयातील सुमारे ९०० गावांमध्ये आगामी ६ वर्ष कालावधीत जागतिक बँकेच्या अर्थसहाय्याने रु. ४००० कोटी अंदाजित खर्चाचा हवामान अनुकूल कृषी विकास प्रकल्प राबविण्यास संदर्भाधीन शासन निर्णयांन्वये मंजूरी प्रदान केलेली आहे.

कै. चंडिकादास अमृतराव देशमुख ऊर्फ नानाजी देशमुख, समाजसेवक, यांनी भारतातील विविध राज्यांतील दुर्गम, पहाडी गावांतील शेतकऱ्यांना विविध प्रकल्पांच्या माध्यमातून आत्मनिर्भर व उद्यमशील बनविण्यामध्ये आपले जीवन समर्पित केलेले आहे. त्यांनी ग्राम विकास व लोक शिक्षण, गोवंश संवर्धन, पारंपारिक कृषी पद्धतींचा विकास व प्रसार, कृषी सिंचन तसेच जलसंधारणाच्या माध्यमातून कृषी सिंचन क्षेत्रात वाढ करणे इ. विविध समाजोपयोगी कार्यात भरीव योगदान दिलेले आहे. श्री. नानाजी देशमुख यांनी केलेली नि:स्वार्थ समाजसेवा व त्यांचे कृषी क्षेत्रातील योगदान लक्षात घेऊन, जागतिक बँक सहाय्यीत हवामान अनुकूल कृषी विकास प्रकल्पास श्री. नानाजी देशमुख यांचे नाव देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्याबाबत शासन पुढील निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः**

१. जागतिक बँक सहाय्यित हवामान अनुकूल कृषी प्रकल्पास (PoCRA) यापुढे "नानाजी देशमुख कृषी संजीवनी प्रकल्प" म्हणून संबोधण्यात येईल. त्यानुसार महाराष्ट्र शासनांतर्गत या प्रकल्पाशी निगडीत सर्व कार्यालयीन कामकाजासाठी यापुढे **"नानाजी देशमुख कृषी संजीवनी प्रकल्प"** या नवीन नावाचा वापर करण्यात यावा.

२. प्रकल्प संचालक, हवामान अनुकूल कृषी प्रकल्प, मुंबई, यांनी प्रकल्पाच्या उपरोक्त नाम बदलाच्या अनुषंगाने प्रकल्पाकरीता नवीन बोध चिन्ह (LOGO) व ब्रीद वाक्य तयार करुन घ्यावे व त्यास शासन मान्यता घ्यावी. सदर प्रकल्पाच्या बोध चिन्हामध्ये श्री. नानाजी देशमुख यांच्या छायाचित्राचा सुयोग्यरीत्या समावेश करावा.

३. या शासन निर्णयान्वये हवामान अनुकूल कृषी प्रकल्पाच्या केवळ नावात बदल करण्यात येत असून प्रकल्पाच्या मुळ उद्देश, व्याप्ती व संरचनेत कोणताही बदल करण्यात येत नाही.

४. सद्यस्थितीत, जागतिक बँकेशी तसेच केंद्र शासनाशी पत्रव्यवहार करताना प्रकल्पाच्या इंग्रजी भाषेतील Project on Climate Resilient Agriculture (PoCRA) या नावाचा उपयोग करण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११७१२३५४१९७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2017.01.17 12:40:50 +05'30'

**( श्रीकांत चं. आंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
२. मा. मंत्री (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद,विधानभवन,मुंबई.
४. मा. राज्यमंत्री (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व संसद सदस्य/महाराष्ट्र विधानसभा सदस्य /महाराष्ट्र विधानपरिषद सदस्य
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७. प्रधान सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. प्रधान सचिव (सेवा),सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय, मुंबई.
११. आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, पुणे,
१२. प्रकल्प संचालक, हवामान अनुकूल कृषी प्रकल्प, जागतिक व्यापार केंद्र, कफ परेड, मुंबई.

१३. उप सचिव (सर्व), कृषी व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई.
१४. विभागीय आयुक्त (औरंगाबाद / नाशिक/ अमरावती / नागपूर विभाग)
१५. जिल्हाधिकारी (सर्व)
१६. विभागीय कृषी सहसंचालक (सर्व)
१७. जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी (सर्व)
१८. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर,
१९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२०. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
२१. वित्त विभाग (व्यय १ / विसु १), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
२२. नियोजन विभाग ( कार्यासन १४३१), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
२३. निवड नस्ती.